**परिविक्षाधीन कालावधीत अनधिकृत गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिकारी, गट- अ (एस-२०) यांच्या सेवा समाप्त करण्याबाबत. . .**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मवैअ-२०२५/प्र.क्र.२६०/सेवा-१**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक : १० जून, २०२५.

वाचा :-

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवि-२०१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९.०२.२०१६
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवि-२०७१५/प्र.क्र.३०२/कार्या.८, दि.२२.०६.२०२१

**प्रस्तावना :**

या विभागांतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ (एस-२०) या संवर्गात वैद्यकीय अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात येते. सदर वैद्यकीय अधिकारी यांना शासनाच्या परिविक्षा धोरणातील सर्व तरतुदी लागू आहेत. शासन सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांच्या परिवीक्षाधीन कालावधीबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय दि.२९.०२.२०१६ अन्वये तरतूदी विहित करण्यात आल्या आहेत. त्यामधील अ.क्र.१ (३) (ब) नुसार परिवीक्षाधीन कालावधीत कोणत्याही स्वरुपाची रजा (नैमित्तीकं रजा वगळून) उपभोगल्यास त्याचा परिवीक्षाधीन कालावधी रजेच्या कालावधी एवढा वाढविण्यात यावा. तसेच (क) नुसार परिवीक्षाधीन कालावधी जास्तीतजास्त एक वर्षापर्यंत वाढविण्यात यावा. त्यानंतर परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्यात यावा अथवा संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्याची सेवा समाप्त करण्यात यावी अशी तरतूद आहे.

तसेच परिवीक्षाधीन धोरणाबाबत सामान्य प्रशासन विभाग, शा.नि. दि.२२.६.२०२१ मधील मुद्दा क्र.१० (३) व (४) येथील तरतुदीनुसार परिविक्षाधीन कालावधीत नैमित्तीक रजा वगळून अन्य कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करताना त्याचा परिविक्षा कालावधी रजेच्या कालावधीइतका अथवा जास्तीत जास्त एक वर्षासाठी वाढविण्याची तरतूद आहे. तसेच परिवीक्षाधीन कालावधीत उमेदवार ७ दिवसांपेक्षा जास्त कालावधीसाठी समर्थनीय कारणाशिवाय गैरहजर राहिल्यास त्याची सेवा समाप्त करण्याची तरतूद आहे.

या विभागातील अनेक वैद्यकीय अधिकारी हे परिविक्षा कालावधीत एक वर्षापेक्षा अधिक कालावधीसाठी अनधिकृतपणे गैरहजर असल्याची बाब निदर्शनास आली असल्याने त्यांच्या सेवा समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार परिविक्षा धोरणासंदर्भातील वाचा क्र.१ व २ मध्ये नमूद तरतूदी विचारात घेता, परिविक्षा कालावधीत एक वर्षापेक्षा अधिक कालावधीसाठी अनधिकृतपणे गैरहजर असलेल्या सोबतच्या विवरणपत्रात नमूद वैद्यकीय अधिकारी गट-अ यांच्या सेवा समाप्त करण्यात येत आहेत.

महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम १९७९ मधील नियम ५ स्पष्टीकरणांतर्गत कोणत्या बाबी शिक्षा ठरणार नाहीत याचा उल्लेख केला असून या स्पष्टीकरणातील (आठ) (अ) नुसार परिवीक्षाधीन नियुक्ती केलेल्या शासकीय सेवकाची सेवा, त्याच्या परिवीक्षा काळामध्ये किंवा त्याच्या अखेरीस, त्याच्या नियुक्तीच्या अटीनुसार किंवा अशा परिविक्षेचे नियंत्रण करणारे नियम व आदेश यानुसार समाप्त करणे म्हणजे शिक्षा होत नाही.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०६१०१६०२४४५५१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK NIVARTTI KENDRE

Digitally signed by DEEPAK NIVARTTI KENDRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=438e1c3198eeaf94d4e0935b5b64b843d8c7195fb67eb9e8292985b766c4efc8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C351F74FB3439ACA71466FCFBB2509C3310AE753E395A89FFA7C6E3887B0AADF, cn=DEEPAK NIVARTTI KENDRE
Date: 2025.06.10 16:06:23 +05'30'

**(दी. नि. केंद्रे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत :

१) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपुर.
२) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
४) उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ (सर्व)
५) जिल्हा शल्यचिकित्सक (सर्व)
६) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
७) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
८) संबंधित वैद्यकीय अधिकारी यांना संबंधित उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ यांचेमार्फत
९) निवड नस्ती सेवा- १.

| **परिविक्षाधीन कालावधीत अनधिकृत गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांचे विवरणपत्र** | |
|---|---|
| अ.क्र | वैद्यकीय अधिकाऱ्यांचे नाव |
| ०१ | डॉ. अनिता विठ्ठलराव काळे |
| ०२ | डॉ. सचिन अरूण गायकवाड |
| ०३ | डॉ. सचिन नागनाथ शिंदे |